# इस्लामची आर्थिक व्यवस्था

लेखक
मौलाना मौदुदी (रह.)

अनुवादक
सय्यद ज़ाकीर अली

*''अल्लाह, असीम दयावंत व कृपावंतच्या नावाने''*

मानवाच्या आर्थिक जीवनात न्याय व्यवस्था कायम राखण्यासाठी 'इस्लाम'ने काही सिद्धांत आणि मर्यादा घालून दिल्या आहेत. जेणेकरून संपत्तीची निर्मिती, उपयोग व वितरणाची संपूर्ण व्यवस्था त्याने नेमून दिलेल्या मर्यादेच्या आत चालावी.

'इस्लाम'ला या प्रश्नाबाबत कोणताच रस नाही की धनोपार्जनाच्या कायद्याचे व वितरणाचे स्वरुप कसे असावे. अर्थातच या गोष्टी अथवा त्याचे स्वरुप विभिन्न युगांत संस्कृतीच्या विकासाबरोबर बदलत असतात व मानवाच्या परिस्थिती व गरजांनुसार आपोआप निर्धारित होत असतात. इस्लाम असे इच्छितो. की, सर्वच युगांमधे व सर्वच परिस्थितीत मानवाच्या 'आर्थिक-क्रिया' जे स्वरूप धारण करतील, त्यात हे सिद्धांत कायमस्वरूपी लागू असावेत व त्या निर्धारित

नियमांचे काटेकोर पालन करण्यात यावे. इस्लामी दृष्टिकोनानुसार धरती आणि त्यावर अस्तित्वात असलेल्या सर्व वस्तू ईश्वराने मानवजातीकरिता निर्माण केल्या आहेत. म्हणून मनुष्याचा हा जन्मसिद्ध अधिकार आहे की, त्याने या धरतीवर आपली उपजीविका प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा. या अधिकारात सर्वच मानव समान रूपाने वाटेकरी आहेत व कोणालाही या अधिकारापासून वंचित केले जाऊ शकत नाही. तसेच कोणालाही या बाबतीत इतरांच्या तुलनेत प्राथमिकता प्राप्त होऊ शकत नाही. कोणत्याही व्यक्तीवर, जातीवर अथवा वर्गावर अशा प्रकारचे कोणतेच वैधानिक प्रतिबंध लावले जाऊ शकत नाही की ज्यामुळे त्याला आर्थिक साधनांतून काहींचा वापर करण्याचा अधिकारच नसावा किंवा काही व्यवसायाचे मार्ग त्याच्यासाठी बंद करण्यात यावेत. त्याचप्रमाणे धार्मिक नियमांच्या आधारावर, भेदभावाचा

व्यवहार केला जाऊ नये की ज्यामुळे एखाद्या आर्थिक साधनावर किंवा उपजीविकेच्या साधनांवर कोण्या एका विशेष वर्गाचा, जातीचा किंवा परिवाराचा एकाधिकार स्थापित होईल. ईश्वराने निर्माण केलेल्या धरतीवर त्याने निर्माण केलेल्या साधनांतून आपला वाटा प्राप्त करण्याचा प्रयत्न करणे हा सर्व मानवांचा समान अधिकार आहे. सर्वांनाच उपजीविका प्राप्त करण्याच्या समान संधी प्राप्त झाल्या पाहिजेत.

निसर्गाच्या ज्या वरदानांना जीवनोपयोगी बनविण्यामध्ये कोणाच्या प्रयत्नांचा किंवा योग्यतेचा वापर होत नाही तर त्यावर सर्वांना या गोष्टीचा समान अधिकार प्राप्त आहे की त्यापासून आपल्या आवश्यकतेनुसार लाभ घ्यावा. नद्या व ओहोळांचे पाणी, जंगलाची लाकडे, नैसर्गिक रूपाने उगलेल्या झाडांची फळे, स्वतंत्र रुपाने

उगलेले गवत आणि वैरण, हवा, पाणी, मऊ भुमीचे प्राणी, भूतलावरील खाणी इ. वर कोणाचाही एकाधिकार स्थापित होऊ शकत नाही. तसेच कोणत्याही प्रकारचे असे प्रतिबंध लावले जाऊ शकत नाहीत की ज्यामुळे सर्व सामान्य जनतेला त्याचा मोबदला दिल्याशिवाय त्या पासून आपल्या गरजा भागविता येऊ नये. मात्र ज्या 'लोकांची' व्यवसायिक उद्देशाने मोठ्या प्रमाणात त्यातून एखाद्या बाबींचा उपयोग करण्याची इच्छा असेल तर त्यावर 'कर' (टॅक्स) लावला जाऊ शकतो.

ईश्वराने ज्या वस्तू मानवाच्या लाभाकरीता निर्माण केल्या आहेत त्यांना व्यर्थ वाया घालणे योग्य नाही. त्या वस्तूंपासून त्याने स्वत: लाभ घ्यावा अथवा दुसऱ्यांना त्याचा लाभ घेण्यासाठी सोडाव्यात. याच सिद्धांताच्या आधारावर कायदा निर्णय देतो की कोणतीही व्यक्ती आपली जमिन तीन

वर्षापेक्षा अधिक मुदतीपर्यंत पड़ीक ठेवू शकत नाही. जर भू-मालकाने त्याच्या जमीनीचा कृषीसाठी, किंवा आवासनिर्मितीसाठी किंवा इतर योजनासाठी वापर न केल्यास तीन वर्षाची मुदत संपताच ती जमीन पडिक समजली जाईल. अन्य कोणत्याही व्यक्तीने त्या पडिक जमीनीचा वापर केल्यास त्यावर कोणताच आक्षेप घेतला जाणार नाही. त्याचप्रमाणे इस्लामी प्रशासनास ती जमीन कोणालाही कसण्यासाठी देण्याचा पूर्ण अधिकार असेल.

जी व्यक्ती प्रत्यक्षरित्या निसर्गाच्या खजिण्यातून आपल्या परिश्रमाने व कौशल्याने एखाद्या जीवनोपयोगी वस्तूची निर्मिती करील, ती व्यक्ती त्या वस्तूची मालक असते. उदारणार्थ, कोणाचाही मालकी हक्क सिद्ध होत नसलेल्या एखाद्या व्यर्थ पड़िक पडलेल्या जमिनीस कोणी आपल्या अधिकारात घेऊन एखाद्या लाभदायक कार्यात उपयोगी आणल्यास त्या व्यक्तीस या अधिकारापासून

वंचित करता येणार नाही. इस्लामी दृष्टिकोनानुसार या जगामध्ये मालकी अधिकाराची सुरूवात अशाच प्रकारे झाली. प्रथम जेव्हा पृथ्वीवर 'मानववस्ती'ची सुरुवात झाली तेव्हा सगळ्या वस्तू सर्वजण सार्वजनिकरित्या वापरत असत. मग कोणीतरी एखाद्या सार्वजनिक वस्तूस आपल्या अधिकारात घेऊन वापरण्यायोग्य बनविली आणि ती वस्तू त्या व्यक्तीच्या मालकीची झाली. अर्थात, ती वस्तू त्याच्या स्वत:करिता आरक्षित करण्याचा आणि योग्य मोबदला घेऊन दुसऱ्यांना वापरण्यासाठी देण्याचा व या माध्यमातून धन कमविण्याचा अधिकार मिळाला. हीच गोष्ट मनुष्याच्या सर्व आर्थिक व्यवहाराचा नैसर्गिक आणि भौतिक पाया आहे. हा पाया यथास्थितीत कायम असावयास पाहिजे.

इस्लामी विधी (शरीयत) च्या वैध प्रणालीनुसार जो मालकी हक्क या जगात ज्याला प्राप्त आहे तो प्रत्येक स्थितीत आदर व सन्मानास पात्र आहे. वाद असू शकतो तो केवळ या

बाबतीत की एखादी मालकी शरियतनुसार वैध आहे की अवैध. शरियतच्या कायद्यानुसार अवैध असलेली मालकी संपुष्टात यायलाच हवी. परंतु शरियतनुसार वैध असलेल्या मालकी हक्काच्या बाबतीत हे निश्‍चित आहे की कोणत्याही शासनास किंवा विधीमंडळास ही वैध मालकी संपुष्टात आणण्याचा व त्या वैध अधिकारात ढवळाढवळ करण्याचा कोणताच अधिकार नाही. सामाजिक सुधारणांच्या नावावर शरियत ने दिलेल्या अधिकारांची पायमल्ली करणारी कोणतीही व्यवस्था तयार केली जाऊ शकत नाही. सामूहिक लाभासाठी व्यक्तींच्या अधिकृत संपत्तीवर स्वतः इस्लामी कायद्याने लावलेल्या प्रतिबंधात कमी करणे हा जेवढा मोठा अन्याय आहे तेवढाच मोठा अन्याय त्यात वृद्धी करणेसुद्धा आहे. इस्लामी शासनाचे हे कर्तव्य आहे की व्यक्तींना मिळालेल्या शरियतसंबंधी अधिकारांचे रक्षण करावे व त्यांच्याकडून समाजाचे त्यांच्यावर असलेले अधिकार मिळवावेत जे इस्लामी कायद्याने निश्‍चित केले आहेत.

ईश्वराने साधनांचे वितरण समानतेनुसार केलेले नसून आपल्या तत्त्वदर्शितेच्या आधारावर काहीजणांना इतरांच्या तुलनेत श्रेष्ठत्व प्रदान केले आहे. सौंदर्य, स्वरमाधुर्य, स्वास्थ्य, शारीरिक शक्ती, मानसिक योग्यता, जन्मगत वातावरण वगैरे सर्व मानवांना समानरित्या मिळालेले नाही. नेमका हाच प्रकार उपजीविकेचा आहे. ईश्वराने निर्माण केलेल्या सृष्टीची पण हीच अपेक्षा आहे. मानवांच्या दरम्यान त्यांच्या उपजीविकेत अंतर असावे. म्हणून अशा प्रकारचे सर्व उपाय इस्लामी दृष्टिकोनानुसार उद्देश व सिद्धान्ताच्या स्वरूपात चुकीचे आहेत जे मानवांच्या दरम्यान एक कृत्रिम आर्थिक समानता प्रस्थापित करण्यासाठी स्वीकारले जातात. इस्लाम ज्या समानतेचा पुरस्कर्ता किंवा समर्थक आहे ती उपजीविकेतील समानता नसून उपजीविकेकरिता असलेल्या प्रयत्नांतील आणि संधीतील समानता आहे. इस्लाम इच्छितो की समाजात

अशा प्रकारचे कायदे आणि सामाजिक प्रथांचे अडसर बाकी राहू नयेत की ज्यांच्या आधारावर एखादी व्यक्ती आपल्या योग्यते व क्षमतेनुसार आर्थिक प्रयत्न करू शकणार नाही. अशा प्रकारचे भेदभावसुद्धा अस्तित्वात नसावेत की ज्यामुळे काही विशेष वर्ग, जाती किंवा वंशाच्या जन्मजात श्रेष्ठत्वास कायमस्वरुपी वैधानिक आरक्षण मिळावे. हे दोन्ही उपाय सामाजिक विषमतेच्या ठिकाणी बळजबरीने एक प्रकारची कृत्रिम समानता स्थापित करीत असतात. म्हणून इस्लाम त्यांना संपवून समाजाच्या आर्थिक व्यवस्थेस अशा नैसर्गिक व्यवस्थेत परिवर्तीत करू इच्छितो की ज्यामध्ये प्रत्येक व्यक्तीकरिता प्रयत्नांच्या संधी खुल्या असाव्यात. परंतु ज्या लोकांना वाटते की आर्थिक प्रयत्नांच्या साधनांत व परिणामात सर्वांना बळजबरीने समान केले जावे किंवा बरोबर केले जावे, इस्लाम या गोष्टीशी सहमत नाही. कारण ते लोक

नैसर्गिक विषमतेस कृत्रिम समानतेत परिवर्तीत करू इच्छितात. नैसर्गिक व्यवस्था केवळ तीच असू शकते ज्या व्यवस्थेत प्रत्येक व्यक्तीने आर्थिक क्षेत्रात आपल्या प्रयत्नांची सुरुवात त्याच स्थानापासून व त्याच अवस्थेतून करावी जेथे ईश्वराने त्यास जन्म दिला आहे. जो मोटारगाडीत आला असेल त्याने मोटारीतून अवश्य फिरावे व जो केवळ दोन पायावर चालत आला त्याने पायी चालावे. जो लंगड्याच्या अवस्थेत जन्मला त्याने लंगडतच आपल्या चालण्याची सुरुवात करावी. समाजाचा नियम असा पण नसावा की ज्यामुळे मोटारगाडीवाल्याचाच केवळ मोटरीवर अधिकार स्थापित व्हावा आणि लंगड्याकरिता मोटारगाडीची प्राप्ती अशक्य व्हावी. त्याचप्रमाणे असे पण होता कामा नये की सर्वांच्या प्रयत्नांची सुरुवात बळजबरीने एकाच ठिकाणावरुन व एकाच अवस्थेतून व्हावी आणि पुढे चालून त्यांना एक

दुसऱ्यांशी बांधून ठेवण्यात यावे. उलट सामाजिक नियम व कायदे असे असावेत की ज्यामध्ये या गोष्टीची अबाधित शक्यता अस्तित्वात असावी की ज्याने लंगडत आपल्या धावण्याची सुरुवात केली होती त्याने आपल्या परिश्रम व योग्यतेच्या जोरावर मोटारगाडीची प्राप्ती शक्य असल्यास अवश्य करावी. जो सुरुवातीला मोटारीत बसून आला होता, परंतु नंतर आपल्या अकार्यक्षमतेमुळे लंगडा झाल्यास लंगडाच राहावा.

इस्लामची इच्छा केवळ एवढीच नाही की सामाजिक जीवनात आर्थिक स्पर्धा सर्वांसाठी खुली व नि:पक्षपाती असावी. याव्यतिरिक्त इस्लाम इच्छितो की या स्पर्धेतील स्पर्धक एक दुसऱ्याप्रति निष्ठूर व निर्दयी नसावेत. ते आपसांमध्ये दयाशील आणि एक दुसऱ्यांना सहकार्य करणारे

असावेत. इस्लाम एकीकडे तर आपल्या नैतिक शिक्षणाद्वारे लोकांमध्ये ही भावना जागृत करतो की आपल्या शोषित आणि मागासलेल्या बांधवांना मदत व सहाय्य करावे. तर दुसरीकडे इस्लाम या गोष्टीची मागणी करतो की समाजामध्ये अपंग, दुर्बल, निराश्रित लोकांच्या मदतीकरिता सहाय्य करणारी एक कायमस्वरूपी संस्था अस्तित्वांत असावी. जे लोक आर्थिक स्पर्धेत भाग घेण्यायोग्य नाहीत, त्यांना या संस्थेद्वारे त्यांचा वैध अधिकार प्राप्त व्हावा. जे लोक परिस्थितीस बळी पडून किंवा संयोगवश या स्पर्धेत मागे पडलेत, त्यांना मदतीचा हात देऊन परत स्पर्धेत टिकण्यायोग्य बनवावे व ज्या लोकांना संघर्षात उतरण्यासाठी मदतीची गरज असेल त्यांना या संस्थेकडून मदत मिळावी. या उद्देशपूर्तीसाठी इस्लामने कायद्याच्या आधारावर ही गोष्ट निश्चित केली की देशाच्या संपत्तीच्या एकूण जमा राशीवर किंवा संपूर्ण

व्यापारिक भांडवलावर अडीच टक्के वार्षिक जकात वसूल केली जावी. संपूर्ण कृषीभूमीच्या उत्पन्नाच्या पाच ते दहा टक्के, काही खनिज पदार्थांच्या उत्पन्नाचा वीस टक्के भाग वसूल केला जावा. पाळीव प्राण्यांच्या एका निश्चित संख्येतून मिळणाऱ्या एका निश्चित उत्पादनातून वार्षिक जकात काढून त्यातून मिळणारे सर्व धन निर्धनांना, अनाथांना किंवा असंपन्न लोकांना मदतीच्या स्वरुपात वापरण्यास देण्यात यावे. हा एक असा सामूहिक विमा आहे की यामुळे इस्लामी समाजात कोणतीही व्यक्ती जीवनावश्यक गरजांपासून वंचित राहू शकणार नाही. कोणताही श्रमिक एवढा लाचार व विवश होणार नाही की उपासमारीच्या भीतीपोटी मजुरीच्या त्या सर्व लादलेल्या अटी मान्य करण्याची त्याच्यावर पाळी यावी. ह्या अटी जकातीच्या या व्यवस्थेमुळे कोणत्याही व्यक्तीची शक्ती आर्थिक स्पर्धेत आवश्यक असलेल्या किमान स्तरापेक्षा कमी

पडणार नाही.

व्यक्ती व समाजामध्ये इस्लाम असे संतूलन स्थापन करतो की ज्यामध्ये व्यक्तीचे व्यक्तित्व आणि त्याचे स्वातंत्र्य अबाधित राहाते. त्याचप्रमाणे समाजहितासाठी हे स्वातंत्र्य घातक असणारे नसून फायदेशीर असते. इस्लाम अशा प्रत्येक राजनितिक किंवा आर्थिक व्यवस्थेस झुगारून देतो की जी व्यवस्था 'व्यक्ती' ला 'समाजात' लुप्त करते व त्या व्यक्तीसाठी त्याच्या व्यक्तित्व विकासासाठी आवश्यक असलेले स्वातंत्र्य संपुष्टात आणते. कोणत्याही देशाच्या उत्पादनाच्या सर्व साधनांच्या राष्ट्रीयकरणाचा हा अवश्य परिणाम होतो की देशाच्या सर्व 'व्यक्ती' 'समाजा' च्या बंधनात जखडल्या जातात. अशा स्थितीत त्यांच्या वैयक्तिकतेचे संरक्षण कठीणच नव्हे तर अशक्य आहे. माणसाच्या वैयक्तिततेसाठी राजनितिक व सामाजिक

स्वातंत्र्य जेवढे आवश्यक आहे तेवढेच आर्थिक स्वातंत्र्य पण आवश्यक आहे. मानवतेचे अस्तित्व अबाधित ठेवण्यासाठी सामूहिक जीवनात किमान एवढी संधी तर अवश्य असावी की कोणत्याही व्यक्तीस आपली उपजीविका स्वतंत्ररित्या प्राप्त करून आपला आत्माभिमान व विवेक अबाधित ठेवता यावा. व आपल्या मानसिक व नैतिक क्षमतांचा आपल्या आवडीनुसार विकास करता यावा. दुसऱ्यांच्या हाती नियंत्रण असलेल्या धान्य-पुरवठ्यातून गरजेपेक्षा जास्त धान्य मिळाल्यामुळे कोणी समाधानी होत नसतो. कारण व्यक्तीच्या विकासात येणारे अडसर केवळ शारीरिक विकासामुळे दूर होत नसतात. ज्या प्रमाणे इस्लाम अशा प्रकारच्या दुर्व्यवस्थांना पसंत करीत नाही, त्याचप्रमाणे तो अशा सामूहिक दुर्व्यवस्थांना पण तिरस्कृत करतो की ज्या मध्ये व्यक्तींना सामाजिक व आर्थिक क्षेत्रात स्वैराचाराचे स्वातंत्र्य

दिले जाते. व त्यांना त्यांच्या इच्छेपूर्तीसाठी व स्वार्थहितासाठी समाजाचा बळी घेण्याची उघड सूट दिली जाते. या दोन्ही अतिरेकांच्या दरम्यान इस्लामने जो मार्ग निश्चित केला आहे तो हा आहे की, व्यक्तीने प्रथमत: समाजाच्या काही नियमांचे व कर्तव्याचे पालन करावयास पात्र व्हावे व नंतर तिने तिच्या व्यवहारात स्वतंत्ररित्या वागावे. अशा नियमांचे व कर्तव्यांचे तपशील प्रस्तूत करण्याची येथे संधी नाही. तरी पण न्यायी एक संक्षिप्त रुपरेषा येथे प्रस्तुत आहे.

प्रथम उपजिवीकेचा विषय घेऊ या. धनसंपत्ती कमविण्याच्या साधनांचे इस्लामने जेवढ्या सूक्ष्मरितीने योग्य अयोग्याचे वर्गीकरण केलेले आहे. तेवढे जगाच्या कोणत्याच कायद्याने केले नाही. इस्लाम अगदी निवडून व

वेचून आणि नेमकेपणाने अशा सर्व साधन प्रणालींना अवैध घोषित करतो की ज्यामुळे एक व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीस किंवा एकूण सर्व समाजाला नैतिक व नैसर्गिक हानी पोहोचवून आपली उपजीविका भागवितो. दारू व मादक पदार्थांचे उत्पादन व विक्री, अश्लिलता, नृत्य गायन व्यवसाय, जुगार, सट्टा, लॉटरी, व्याजांचे व्यवहार, दगाबाजी आणि कुरापतीचे धंदे अशा सर्वच व्यवसायिक प्रणाली ज्यामध्ये एका पक्षाचा लाभ व फायदा असतो व दुसऱ्यांचे नुकसान मात्र निश्चित असते. जीवनावश्यक वस्तूंची विक्री बंद करून व कृत्रिम टंचाई निर्माण करून वस्तूंच्या किंमती भरमसाठ वाढविणे व अशा प्रकारचे सर्वच व्यवहार जे समाज हितास घातक आहेत, इस्लामी कायद्याने सर्वस्वी अवैध घोषित केले आहेत. या बाबतीत आपण इस्लामच्या आर्थिक नियमांचे निरीक्षण केल्यास अवैध प्रणालींची एक लांबलचक यादी

आपल्या समोर येईल व बहुतेक अशा प्रणाली निदर्शनास येतील ज्यांना स्वीकारून व अंगीकारूनच वर्तमान भांडवलवादी व्यवस्थेत लोक कोट्याधीश होत आहेत. इस्लाम अशा सर्वच प्रणालींवर कायद्याने बंदी घालतो व मानवास केवळ मात्र अशारितीने धनसंपत्ती कमविण्याची परवानगी देतो, ज्यापासून त्याने दुसऱ्यांची वास्तविक आणि लाभदायक सेवा करून, न्यायास अनुसरून त्याची किंमत प्राप्त करावी.

वैध साधनप्रणालीस अनुसरून कमविलेल्या धनसंपत्तीवर इस्लाम व्यक्तींच्या मालकी अधिकारांना मान्यता देतो. परंतु हे अधिकार मात्र अमर्यादित नाहीत. तो मानवास नियमबद्ध करतो की त्याने आपली वैध मिळकत योग्य कामांतच खर्च करावी. खर्चावर इस्लामने अशा प्रकारचे नियम लागू केलेत की या नियमांच्या फलस्वरूप

मानवाने चांगले स्वच्छ जीवन अवश्य जगावे परंतु व्यभिचारात संपत्तीचा शिमगा खेळू नये. तसेच आपल्या समृद्धीच्या प्रदर्शनात आखून दिलेल्या मर्यादाबाहेर जाऊ नये की ज्यामुळे इतरावर त्याचे हकनाक प्रभुत्व गाजत रहावे. अपंगाच्या काही बाबतीत तर इस्लामी कायद्याने स्पष्ट स्वरूपात बंदी घातली आहे व इतर काही प्रकारांचा स्पष्ट उल्लेख नसला तरी इस्लामी शासनास हा अधिकार प्राप्त आहे की, संपत्तीची अयोग्य रितीने विल्हेवाट लावणाऱ्यांना बळाचा वापर करून रोखावे.

वैध आणि योग्य खर्चानंतर जी संपत्ती माणसाजवळ शिल्लक राहते ती संपत्ती तो जमा करू शकतो आणि परत त्या संपत्तीचा धनोपार्जनासाठी वापरसुद्धा करू शकतो. मात्र या दोन्ही अधिकारावर पण नियम लागू आहेत. संपत्ती जमा करावयाची असल्यास हा नियम लागू आहे की जमा

राशी एका निश्चित मर्यादेपेक्षा वाढल्यास अडीच टक्के वार्षिक जकात द्यावी लागेल. संपत्तीची व्यवसायात गुंतवणूक करावयाची असल्यास केवळ वैध व्यवसायातच तिची गुंतवणूक करता येईल. मग तो वैध व्यवसाय स्वत:हून केलेला असो अथवा दुसऱ्याला आपले भांडवल, नगदी राशी, जमीन किंवा यंत्र सामग्रीच्या स्वरूपात देऊन नफ्यातोट्यामध्ये वाटेकरी होऊन करायचा असो. हे दोन्ही प्रकार वैध व नैतिक आहेत. या मर्यादा व नियमांचे पालन करून जर कोणी कोट्याधीश अब्जाधीश होत असेल तर इस्लाम ही बाब मान्य करतो व या बाबीस ईश्वराचे वरदान समजतो. परंतु सामाजिक हिताकरिता इस्लाम यावर दोन नियम लागू करतो. प्रथम हे की व्यवसायिकाने आपल्या व्यापारिक स्टॉक आणि कृषीउत्पादनावर जकात द्यावी. द्वितीय हे की त्याने आपल्या व्यवसायात, उद्योगात किंवा कृषी कार्यात ज्या लोकांबरोबर भागीदारीचा अथवा

मजुरीचा व्यवहार केलेला असेल त्यांच्याशी न्यायपूर्ण व्यवहार करावा. यदाकदाचित व्यवसायिक स्वत: योग्य न्याय करू शकत नसेल तर इस्लामी शासन त्याला न्याय करण्यास विवश करील.

तसेच वैध प्रणालीद्वारे गोळा झालेल्या संपत्तीलासुद्धा इस्लाम जास्त मुदतीपर्यंत एककेंद्रित राहू देत नाही. याउलट वारसाहक्काच्या कायद्यानुसार तिला पिढी दर पिढी हस्तांतरीत करीत असतो. या बाबतीत इस्लामी कायद्याचा कल जगातील इतर कायद्यापेक्षा भिन्न आहे. इस्लामेतर कायदे असा प्रयत्न करतात की जी संपत्ती एकदा गोळा झाली की ती पिढी दर पिढी एकाच ठिकाणी जमा असावी. याउलट इस्लामचा हा कायदा आहे की जी संपत्ती एखाद्या व्यक्तीने आपल्या हयातीत (आयुष्यात) गोळा केली असेल त्याच्या मृत्यूनंतर ती संपत्ती तात्काळ त्याच्या

सग्यासोयऱ्यात व नातलगात वाटली जावी. जवळचे नातलग नसल्यास दूरच्या सग्यासोयऱ्यात त्यांच्या निश्चित व नियमित वाट्यानुसार ती संपत्ती वाटली जाईल. तेसुद्धा नसतील तर मग मुस्लिम समाजाचा त्यावर अधिकार असणारा कायदा व नियम एखाद्या मोठ्या भांडवलदारीला आणि जमीनदारीला सुरक्षित व कायमस्वरुपी राहू देत नाही. वरील सर्व आर्थिक नियमांचे पालन केल्यानंतर सुद्धा संपतीच्या केंद्रीकरणामुळे एखादी त्रुटी जर निर्माण झालीच तर वारसाहक्कसंबंधीचा हा अंतिम घाव त्या त्रुटीस समाप्त करतो.

## समाप्त

